कृषि पर्यवेक्षक (गट-क) संवर्गातील कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) संवर्गात पदोन्नती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृषिआ १०२१/प्र.क्र.११०/१६अे**
मंत्रालय विस्तार इमारत,
मंत्रालय, मुंबई -३२.
तारीख: ०९ फेब्रुवारी, २०२२.

संदर्भ :- १) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र. बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दि.०७ मे, २०२१
२) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना दि.१४.०७.२०२१
३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/कृप/पदो./आस्था-४/७०२/२०२१, दि.२७.०८.२०२१
४) समक्रमांक दि.१८ जानेवारी, २०२२ चे पदोन्नती आदेश

**शासन निर्णय :-**

सन २०२०-२१ च्या निवडसूचीवर कृषि पर्यवेक्षक (गट-क) संवर्गातील १७५ कर्मचाऱ्यांना (वेतनश्रेणी एस-१३ रु.३५,४००-१,१२,४००) महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) (एस-१५ रु.४१,८००-१,३२,३००) या संवर्गात त्यांना वाटप झालेल्या महसूली विभागात दि.१८.०१.२०२२ च्या आदेशान्वये पदोन्नतीने पदस्थापना दिलेली आहे. सन २०२०-२१ च्या निवडसूचीतील कृषि पर्यवेक्षक (गट-क) संवर्गातील उर्वरित ५ कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) (वेतनश्रेणी एस-१५ रु.४१,८००-१,३२,३००) या संवर्गात त्यांना वाटप झालेल्या महसूली विभागात प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने निव्वळ तात्पुरती पदोन्नती देऊन त्यांची पदोन्नतीने पदस्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | निवडसूचीतील क्रमांक/ज्येष्ठता क्रमांक | नाव व पदनाम व सध्याचे कार्यालय | वाटप झालेला महसुली विभाग | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ८६/१२६० | श्री.श्रीकृष्ण बळीराम बेलखेडे, कृषि पर्यवेक्षक, तालुका कृषि अधिकारी, कारंजा, जि. वाशिम | अमरावती | कृषि अधिकारी, तालुका कृषि अधिकारी, कारंजा, जि. वाशिम (रिक्त पदी) |
| २ | ९६/१२९९ | श्री. राजेंद्र आनंदराव ढंगारे, कृषि पर्यवेक्षक, कृषि चिकीत्सालय, सिंधखेडा, जि. बुलढाणा | कोकण-२ | मंडळ कृषि अधिकारी, म्हसळा, ता. म्हसळा, जि. रायगड (रिक्त पदी) |
| ३ | ११५/१३३० | कु.सरोज धरमदास मेंढे, कृषि पर्यवेक्षक, विभागीय कृषि सहसंचालक, नागपूर | नागपूर | कृषि अधिकारी, विभागीय कृषि सहसंचालक, नागपूर. (रिक्त पदी) |
| ४ | १५९/१७२४ | श्री.फुले सचिन बुआजी, कृषि पर्यवेक्षक, तालुका कृषि अधिकारी, मोहोळ, जि. सोलापूर | पुणे | कृषि अधिकारी, तालुका कृषि अधिकारी, सातारा, जि. सातारा (रिक्त पदी) |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ५ | १८१/२२५१ | श्री. आढळ जयराम हरी, कृषि पर्यवेक्षक, तालुका कृषि अधिकारी, सुरगाणा, जि. नाशिक | नागपूर | मंडळ कृषि अधिकारी, भिवापूर, ता. भिवापूर, जि.नागपूर. (रिक्त पदी) |

२. सदर पदोन्नती ही सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ वरील मा.सर्वोच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात रिक्त पदांवर ज्येष्ठतेने देण्यात येत आहेत.

३. सदर पदोन्नती ही तात्पुरत्या स्वरुपाची असल्यामुळे पदोन्नतीच्या दिनांकापासून सेवाज्येष्ठतेचा हक्क सांगता येणार नाही.

४. संबंधित कृषि पर्यवेक्षक यांनी महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब (कनिष्ठ) पदावरील तात्पूरती पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०९.२०१६, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही २०१८/प्र.क्र.१५९/का.१२, दि.०१.०८.२०१९ मधील तरतूदीनुसार संबंधित अधिकाऱ्यांचे नाव सन २०२०-२१ च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल आणि पुढील दोन वर्षी (सन २०२१-२२ व २०२२-२३) होणाऱ्या निवडसूचीमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत (सन २०२३-२४) कृषि अधिकारी पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

५. सदर अधिकाऱ्यांची कृषि अधिकारी पदावरील तात्पुरती पदोन्नती ही सदर अधिकाऱ्यांविरुध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

६. उपरोक्त अधिकाऱ्यांनी त्यांचा सध्याच्या पदाचा पदभार विभागातील निकटतम ज्येष्ठ अधिकाऱ्यांकडे सोपवून तात्काळ पदोन्नतीच्या पदावर रूजू व्हावे.

७. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२०९११२४३५१९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sarita Rishi Bandekar Deshmukh
Date: 2022.02.09 11:26:16 +05'30'

**( सरिता बांदेकर-देशमुख )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अप्पर मुख्य सचिव
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्विय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) ½, महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
९. संचालक, वसंतराव नाईक कृषि व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था, (वनामती) नागपूर.
१०. उप सचिव (१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
११. संबंधीत विभागीय कृषि सह संचालक
१२. संबंधीत जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी/उपविभागीय कृषि अधिकारी
१३. कृषि सह संचालक, (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे
१४. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
१५. सर्व संबंधित अधिकारी
१६. निवड नस्ती /१६अे.